कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.
कै. (श्री.) राहुल हरिश्चंद्र सावंत, उपशिक्षक

महाराष्ट्र शासन

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.०६/टीएनटी-६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

दिनांक : १३ ऑगस्ट, २०२४.

संदर्भ :-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९,दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/ टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सातारा यांचे क्र. शिक्षण/आस्था-२/७७९६/२०२३, दि.१२/०९/२०२३ चे शिफारस पत्र
४. शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/८०२ /संकीर्ण/७८३८/२०२३, दि. १/११/२०२३.

ज्ञापन :-

कै.(श्री.) राहुल हरिश्चंद्र सावंत, उपशिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, मोरबाग, ता.जि.सातारा यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दि. ११/०९/२०२० रोजी मृत्यू झालेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार कै.(श्री.) राहुल हरिश्चंद्र सावंत यांच्या वारसास रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील दि.०१/११/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सातारा यांनी संदर्भ क्र. (३) येथील दि.१२/०९/२०२३ रोजीच्या पत्रान्वये कै.(श्री.) सावंत यांच्या वारसास रु.५० लाख विमा कवच सानुग्रह अनुदान सहाय्य मिळण्याकरिता शिफारस केली आहे.

३. गट विकास अधिकारी वर्ग-१, पंचायत समिती सातारा यांच्या दि.१४/०८/२०२० रोजीच्या आदेशान्वये कोरोना प्रतिबंधात्मक उपाय योजनेसाठी कै.(श्री.) सावंत यांची दि.१७/०८/२०२० पासून मौजे मोरबाग ता.जि.सातारा या ठिकाणी नियुक्ती करण्यात आली. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), सातारा जिल्हा परिषद, सातारा व गट शिक्षणाधिकारी, सातारा पंचायत समिती, सातारा यांनी दि.०१/०२/२०२३ च्या प्रमाणपत्रान्वये कै. (श्री.) सावंत यांनी दि.१७/०८/२०२० पासून दि.०९/०९/२०२० अखेर कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्यावर हजर राहून कामकाज केल्याचे प्रमाणित केले आहे.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांनी कै.(श्री.) सावंत यांचा दिनांक ११/०९/२०२० रोजी कोव्हिड-१९ संसर्ग आजारामुळे मयत झाले असुन इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्युपूर्वी १४ दिवसाच्या काळात कर्तव्यावर हजर असल्याबाबत दिनांक १२/०९/२०२३ च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) सावंत यांना दि.११/०९/२०२० रोजी जिल्हा रुग्णालय, सातारा या ठिकाणी दाखल करण्यात आले. सदर रुग्णालयात त्यांची दि. ११/०९/२०२० रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली. उपचारा दरम्यान दि.११/०९/२०२० रोजी त्यांचा मृत्यु झाला. याबाबतचे वैद्यकीय प्रमाणपत्र द्वारे वैद्यकिय अधिकारी,(रजिस्टर नं. ०८३६४४) जिल्हा रुग्णालय, सातारा यांनी दि.२५/०१/२०२४ अन्वये प्रमाणित केले आहे.

६. निबंधक, (जन्म-मृत्यू), जिल्हा रुग्णालय, सातारा यांनी त्यांच्या दि.०५/०७/२०२२ रोजीच्या प्रमाणपत्रान्वये कै. (श्री.) सावंत यांचा दि.११/०९/२०२० रोजी मृत्यू झाल्याबाबतचे मृत्यू प्रमाणपत्र दिलेले आहे.

७. मा. सह दिवाणी न्यायाधिश, कनिष्ठ स्तर, सातारा यांनी कै. (श्री.) सावंत यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती निशा राहुल सावंत (पत्नी), (२) कु. रोहन राहुल सावंत (मुलगा), (३) कु. सायली राहुल सावंत (मुलगी) व (४) श्रीमती शोभा हरिश्चंद्र सावंत (आई) यांना घोषित केले आहे.

८. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), सातारा जिल्हा परिषद, सातारा व गट शिक्षणाधिकारी, सातारा पंचायत समिती, सातारा तसेच, वैद्यकिय अधिकारी,(रजिस्टर नं. ०८३६४४) जिल्हा रुग्णालय, सातारा यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कागदपत्रांची पडताळणी करून संदर्भ क्र. ४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार कै. (श्री.) सावंत यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती निशा राहुल सावंत (पत्नी), (२) कु. रोहन राहुल सावंत (मुलगा), (३) कु. सायली राहुल सावंत

(मुलगी) व (४) श्रीमती शोभा हरिश्चंद्र सावंत (आई) यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच/सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

९. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.७४९/व्यय-५, दिनांक २९/०७/२०२४ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१०. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त ( शिक्षण ), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

११. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०८१३१६०७०६०५२१ असा आहे. सदर शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.13 16:22:24 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), सातारा

**प्रत माहितीसाठी:-**

१. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती निशा राहुल सावंत,स.न.१३९ ब, एफ अंबराई रेसिडेन्सी, शाहूनगर गोडोली, सातारा-४१५००१.
४. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ०६/२०२४)